**वैधमापन शास्त्र यंत्रणेतील २१० अस्थायी पदांना दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. :- वैमाशा-२०१६ / १८४ / प्र. क्र. ४० / ग्रासं-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ५ ऑक्टोबर, २०१८

वाचा:- १) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-१००३ /प्र.क्र. ४८३/नापु-१४, दिनांक २६/६/२००३
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. असंक-१००९/प.क्र.१२/(भाग-२)/२००४/वि.सु-१, दिनांक ४/१०/२००४
३) शासन निर्णय क्र. -वैमाशा-२०१६ /१८४ / प्र.क्र. ४० / ग्रासं-३ दिनांक १६ मार्च, २०१८
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि- २०१६/प्र. क्र. ८/१६/ आ.पु.क. दिनांक ७/९/२०१८.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त नमुद शासन निर्णयान्वये नियंत्रक, वैधमापन शास्त्र यंत्रणेमध्ये वेगवेगळया संवर्गात अस्थायी पदे निर्माण करण्यात आली असून सदर पदांना वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

२. वरील अनुक्रमांक ३ दिनांक १६/३/२०१८ च्या आदेशान्वये नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मुंबई आणि जिल्हा स्तरावरील आस्थापनेवर असलेल्या एकूण २१० अस्थायी पदांना दिनांक १/३/२०१८ ते ३०/९/२०१८ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती.

नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांच्या आस्थापनेवरील या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र अ " मध्ये दर्शविलेली एकूण २१० अस्थायी पदांना वरील अनुक्रमांक ३ दिनांक ७/९/२०१८ च्या आदेशान्वये दिनांक १/१०/२०१८ ते २८/२/२०१९ (पाच महिने) पर्यंत चालू ठेवण्यास खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून शासन मंजूरी देत आहे.

१) प्रस्तावित २१० पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसावे.
२) सदर पदांवरील वेतनाचा खर्च वित्तीय वर्ष २०१८-२०१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.
३) प्रस्तावित पदे ही सुधारित आकृतीबंधातील असून त्यामुळे सुधारित आकृतीबंध बदल होणार नाही अथवा संवर्गातही बदल होणार नाही.
४) आढाव्याची कार्यवाही दरवर्षी करण्यात येईल.

३. या विभागाच्या अखत्यारितील विविध विभाग प्रमुखांच्या आस्थापनेवरील पदांच्या आढाव्याला उच्चस्तर समितीने अतिमत: मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सुधारीत आकृतीबंधाबाबतचा घोषित करण्याबाबत अनुक्रमांक १ येथील दिनांक २६/६/२००३ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

यासाठी होणारा खर्च **"मागणी क्रमांक, एम-३, मुख्य लेखाशीर्ष ३४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा (१०६), वजन व मापे यांचे विनियमन (००) (०१) वजने व मापे विनियमन, (३४७५००९३)"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१८ - २०१९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६ / प्र. क्र. ८/ १६/आ.पु.क. दिनांक ७/९/२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१००६१३२४२६३२०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Suresh Dnyandeo Redekar

Digitally signed by Suresh Dnyandeo Redekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b6deeb0e386eb5698cc129016108429cd770a158e87c3a2a96134dccfff610, serialNumber=b0c49d4a2d63d7827dd22b5ccbfc134f691b42353bcee54455b220aff75b429c, cn=Suresh Dnyandeo Redekar
Date: 2018.10.06 13:26:12 +05'30'

**(सु. ज्ञा. रेडेकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

सहपत्र-वरीलप्रमाणे

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञयेता ), मुंबई / नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
६) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) उपनियंत्रक, वैधमापन शास्त्र, पुणे, नागपुर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, कोकण, मुंबई महानगर विभाग, ( नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे मार्फत )
८) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई ( ३ प्रती )
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) सर्व सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र. मार्फत (नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक **-वैमाशा-२०१६/१८४/प्र. क्र. ४०/ ग्रासं-३ दिनांक ५ ऑक्टोबर, २०१८** अन्वये दिनांक १ ऑक्टोंबर, २०१८ ते २८ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यात आलेली अस्थायी पदे.

| **अ.क्र** | **पदनाम** | **पदे** |
|---|---|---|
| १ | उपनियंत्रक वैधमापन शास्त्र | २ |
| २ | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र | ९ |
| ३ | स्वीय सहायक | १ |
| ४ | अधिक्षक | २ |
| ५ | निरीक्षक, वैधमापन शास्त्र (निवड श्रेणी ) | १४ |
| ६ | निरीक्षक, वैधमापन शास्त्र ( निम्न श्रेणी ) | ४२ |
| ७ | वरिष्ठ लिपीक | २ |
| ८ | कनिष्ठ लिपीक | ११ |
| ९ | टंकलेखक | १ |
| १० | लिपीक-टंकलेखक | १ |
| ११ | प्रयोगशाळा सहायक | २ |
| १२ | क्षेत्र सहायक | ४५ |
| १३ | वाहनचालक | ९ |
| १४ | क्रेन चालक | २ |
| १५ | नाईक | २७ |
| १६ | शिपाई | ४० |
| | **एकूण** | **२१०** |